संपादिका

भारती सरमळकर (मुंबई)

अतिथी संपादक

शशिकांत रणावरे (मुंबई)

सह संपादक

सोनाली घाटपांडे (पुणे)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)






ई-साहित्य प्रतिष्ठान

दिनांक ३ जानेवारी २०११

वर्ष तिसरे, अंक ३




# संकल्प २०११

१) आज पुन्हा डायरी उघडणार !

- शशिकांत रणवरे -

२) जगाला प्रेम अर्पावे !

- प्रभा प्रभुदेसाई -

३) स्वतःसाठी जगायला हवं !

- चैताली म्हाप्सेकर -

४) उत्तरं सोडीन.. प्रश्नचं धरीन !

- शंतनू चंद्रात्रे -

५) आयुष्याशी लढूया !

- भारती सरमळकर -

६) जगून घ्या हसून घ्या !

- प्राजक्त देशमुख -



# ऒळख अतिथी संपादकाची

## शशिकांत नामदेव रणवरे

मुंबई

नमस्कार.....

मी शशिकांत नामदेव रणवरे, पाळमुळं सातारा जिल्ह्यातील, फलटण तालुक्यातील पण जन्म मुंबई आणि बालपण, शिक्षण सगळं ठाण्यात. सध्या मुंबईतील एका IT कंपनीत Infrastructure Management Systems या Division मध्ये काम करतॊय. वाचनाची आवड अगदी लहानपणापासूनची, लिहिणं कधी सुरु झालं आठवत नाही, पण सातवीत असताना पहिली कविता लिहिल्याचं पुसटसं आठवतयं. पण काळाच्या ओघात काही गॊष्टी सुटतात, काही हरवतात, काही सोडून जातात तर काही सापडतात. माझही तसच काहीसं झालं. आजूबाजूला असलेल्या माणसांच्या गर्दितली आपली असलेली माणसही परकी वाटायची. ही आपली माणसचं का अशी शंका बर्याचदा यायची. माणसं चांगली पण विरक्त. भयाण एकांतात होतो मी आणि त्याच वेळेस या शब्दांनी मला साथ दिली. आणि नुसतीच साथ नाही तर मी कधी लिहायला बसलॊ तर ते आपोआपच जुळुन येत आणि कविता कधी पूर्ण व्हायची कळायचंच नाही. पण जस जशी त्या गर्दीतली माणसं आपली होऊ लागली तस तसा शब्दांनी अबोला धरायला सुरुवात केली. शब्द माझ्याशी बोलेनासे झाले आणि हळु हळु माझ्या नकळत कुठतरी लुप्त झाले. आता मला त्यांची सवय झाली होती आणि त्यांच्या शिवाय मलाही काही तरी उणं वाटतं होतं. मग मी पुन्हा शॊध घेऊ लागलॊ आणि शोधता शोधता असेच एक दिवस मला ते माझे शब्द ई-लिपीच्या रुपात **“नेटाक्षरी”** च्या माध्यमातून सापडले. तेव्हा मी पक्क ठवरलं आता त्यांना कुठेही जाऊ द्यायचं नाही आणि ते असेच आयुष्यभर माझ्यापाशी रहावेत म्हणून हा सगळा अट्टहास. ई-साहित्यचा मी ऋणी आहे की त्यांनी मला आणि माझ्या शब्दांना त्यांच्या कुटुंबात सामील करुन घेतलं. मी ई-साहित्यच्या संपुर्ण टिमचा आभारी आहे.

ई-साहित्यच्या सर्व रसिक वाचकांना नवीन वर्षाच्या हार्दिक शुभेच्छा !!!

# एक संकल्प अतिथी संपादकाचा

प्रत्येक जुनं वर्ष सरलं की नवीन वर्षाच्या पहिल्या तारखेला माझ्या

टेबलावरील डायरी मला कुत्सित नजरेनं बघतेय अस वाटतं. दर वर्षीच्या माझ्या अनेक संकल्पांची ती बिचारी एकटीच मूक साक्षीदार असते. नवीन संकल्पांचा माझा उत्साह पहिल्या पानावर सुरु होतो आणि पहिल्या पानावरच संपतो. ती डायरी आणि माझ्यातला जिव्हाळा संपतो तो कायमचा आणि नवीन वर्षाची ती नवी कोरी डायरी सरत्या वर्षातील निकामी वस्तू कधी होते कळतच नाही. जसा आपला लाडका गणपती बाप्पा आला की सोबत आपलं वाहन उंदिर ही घेऊन येतो तसचं नवीन वर्ष ही आलं की आपल्या सोबत नवीन संकल्पांच शेपूट घेऊन येतं. ते ही एक प्रकारचं वाहनच, पण संकल्प बरोबर वाहायच अस ठरवलेली अनेक माणसं वाट चुकल्यासारखी पुन्हा परत मागच्याच रस्त्याला आपली जुनी हरवलेली वाट शोधताना दिसतात. नव वर्ष संकल्पांची आणि माझी गट्टी कधी जमलीच नाही. म्हणजे मी एखादा संकल्प केलाय आणि तो पूर्णत्वास गेलाय अस कधीच झालं नाही. तरीही दरवर्षी मी काहीतरी नवीन करायचं अस ठरवलं की माझ्याच आतून कुणीतरी माझ्यावर उपरोधिक हसतयं अस मला वाटायचं.

त्यामुळे दरवर्षी मी जे संकल्प सोडले ते शब्दशः सोडलेच. जशी कविता ठरवून करता येत नाही ती आतूनच यावी लागते, जुळावी लागते, फुलावी लागते अगदी तसच काही तरी संकल्पांच आहे. कधी कधी ते आपोआप जुळत नाहीत तर जुळवावे लागतात नाहीतर खरोखरच "सोडावे" लागतात.

**शशिकांत नामदेव रणवरे**
अतिथी संपादक (मुंबई)

# मी, माझी डायरी आणि पेन

नवीन वर्षाचा पहिला दिवस
पहिला किरण, पहिली हवेची झुळूक
नकळत घरात आली
आणि अचेतन टेबलावरील निपचित डायरीची अस्वस्थ चलबिचल झाली
बाजूलाच पडलेला आळसावलेला पेन
आशाळभूत नजरेने मला शोधू लागला
आज नवीन वर्षाची पहिली तारीख याचा
त्यांना कोणास ठाऊक सुगावा लागला

नवीन वर्ष सगळं कसं नवीन नवीन असतं
भारावलेलं मन जुन्याच पाऊलखुणांवर
नवीन वाटेच्या प्रवासकथा सांगत
हे अस करायचं आणि तसंच वागायचं
माझा निर्धार पक्का असतो
वाढता वाढता वाढत जाते
यादीचा मग विक्रम होतो
मलाच मग धडकी भरते
अन निश्चयाचा वेताळ नकळत सुटतो

तसं मला हे नवीन नव्हतं
प्रत्येक वर्षी हे असच घडतं
पहिल्या पहाटेच नवीन संकल्पाच मुल
कातरवेळेच्या सावल्यात रमत
हसतं बागडतं धुंद होतं आणि
रात्रीच्या अंधारात अचानक कुठेतरी दडतं
पुढच्या वेळी असाच पहिल्या पहाटे यायला

दारु, सिगरेट, पार्ट्या, पब्स मध्ये
सगळं जग बेभान असतं
आणि माझं मन डायरीतल्या शब्दांसारखं
माझ्यावरच रुसून बसतं

यंदा मीही ठरवलयं त्यांच मन मोडायचं नाही
त्यांना नुसतच अस सोडायचं नाही

मनात पक्का निश्चय करुन
मी आज पुन्हा डायरी उघडली
सुस्तावलेलं पेन झटकून हातात घेतलं
आणि
कुठूनतरी, कुणीतरी
उपरोधिक हसलं

**शशिकांत नामदेव रणवरे**
अतिथी संपादक (मुंबई)

# नेटाक्षरीच्या

## सर्व रसिक वाचकांना

## नवीन वर्षाच्या हार्दिक शुभेच्छा !!!



# जगाला प्रेम अर्पावे !!

कुणाला सांगणे काही नसावे
कुणाशी मागणे काही नसावे !

फुलाच्या पाकळ्या वेड्या फुलाव्या,
फुलाला दाहणे काही नसावे !

असा यावा फुलोरा पाकळ्यांचा
रुपाला ते उणे काही नसावे !

फुलाच्या गंधकोशी श्वास गुंते,
फुलाशी धुंदणे काही नसावे !

फुलाने लॉक लोका प्रेम द्यावे,
फुलाला भोगणे काही नसावे !

फुलाने लाख साहूनी उन्हाळे,
पुन्हा तक्रारणे काही नसावे !

अखेरी दान देता मौत यावी,
अजूनी मागणे काही नसावे !

**प्रभा प्रभुदेसाई**
चेन्नई



# गुंता वाढत जातोय !!



स्वतःतच गुरफटताना
विसरलेय का मी?
शब्दांना गुंफून
कोशातून बाहेर पडणारी मी
मिट्ट काळोख करुन बसलीय
तुझ्या घरात
.
असह्य होत कधी कधी
माझं तुझ्यासाठी बहरणं
खूप केलं,
मोहर आला,
गेला....
आता
काहीतरी करायला हवं
खूप जगले तुझ्यासाठी
आता
स्वतःसाठी जगायला हवं.....


**चैताली म्हाप्सेकर**
मुंबई

# RESOLUTION !!

गेली बरीच वर्ष
ठरवत गेलो
हे करीन ते करीन
हे सोडेन ते धरीन.....

गेली बरीच वर्ष
वहावत गेलो
न ठरवलेलं सोडण्यात
ठरवलेलं धरण्यात.....

गेली बरीच वर्ष
थकत गेलो
तेच तेच सोडून
तेच तेच धरुन.....

तसचं या वर्षीही
ठरवत आहे धर-सोड

धरतो आहे
एकमेकांवर फुटणारे झिंगलेले ग्लास
सोडतो आहे
थकलेले कापणारे सुरकुतलेले हात.....

धरतो आहे
चारचौघात पुन्हा पांचालीला वस्त्रहरणासाठी
सोडतो आहे
छातीवर टेकलेल्या कपाळावरील लाल बटबटीत रेषा.....

धरतो आहे
जमिनीच्या तुकड्यासाठी शस्त्र आणि ध्वज हातात
सोडतो आहे
रस्त्याबाजूला पडलेल्या नवजाताकडे ढूंकून बघणं.....

धरतो आहे
तुमच्या नजरेतल्या मला
सोडतो आहे
माझ्यातल्याच 'मी' ला.....

निघून जाईल हे ही वर्ष
छिद्र पडल्या पदरामध्ये
पुण्य टाकल्यासारखे करुन
एकांतात भिजलेल्या मनात
अनेक प्रश्न पुकारुन
म्हणून आजही ठरवतो
उत्तरं सोडीन
प्रश्नच धरीन

सोडवता नाही आले तरी
उत्तराची लांबी तरी वाढवतील




शंतनू चंद्रात्रे
नाशिक

# आयुष्या तुजसी लढण्या !!

श्वासांच्या देऊनी समिधा
मी यज्ञ मांडिला होता
आयुष्या तुजसी लढण्या
मी चंग बांधिला होता......

तू गुर्मीत नेहमी असता
मी स्तब्ध शांत अबोली
तू घाव लाख देताना
ते मिश्किल हसूच ओठी
तू वैतागूनी मग माझा
नाद सोडला होता
आयुष्या तुजसी लढण्या
मी चंग बांधिला होता.....




## भारती सरमळकर

मुंबई

# राहायचे किती असे !!

राहायचे किती असे
पहायचे किती असे
जगुन घ्या हसुन घ्या
जगायचे किती असे

अडथळे अडथळे
चुकविले हुकविले
कवेत घ्या एकदा
अडथळे किती असे

समंध झपाटती पुन्हा
कबंध मातले नवे
द्या वक्रवाकुल्या
समंधही किती असे

तमात लॉप पावता
उजाडते पुन्हा नवे
चला उठा पुर्व व्हा
उगे रवी किती असे....

**प्राजक्त देशमुख**
नाशिक



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरीने मागल्याच आठवड्यात नाबाद ७५चा पल्ला गाठला. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे १००००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईटवर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

---


ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

ई-स्टाप, स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, बालनेटाक्षरी

प्रसिद्ध झालेली ई-बुक्स

- टल्लीची शाळा
- मकरंदच्या त्रिवेण्या
- ग्रेव्हयार्ड लिटरेचर
- चार क्षण
- तो आणि ती
- प्रियेचे अभंग
- देशी दारुचे दुकान-3D
- ई-शाळा
- तो, मी आणि सिगरेट
- मोरया
- लोकल गोष्टी
- मीरा अनुवाद
- ऑथंब
- सावळ्या मुलीची गाणी

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा
**esahity@gmail.com**

**नेटाक्षरीचा** हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा
**netaksharee@gmail.com**

आता ई-साहित्यची वरील सर्व ई-प्रकाशन उपलब्ध आहेत सी डी मध्ये
संपर्क करा ९८९९६७४८२०

www.esahity.com

नेटाक्षरी

